पोलीस आयुक्त, औरंगाबाद शहर यांच्या आस्थापनेवरील मुकुंदवाडी पोलीस ठाण्याचे विभाजन करुन पुंडलीकनगर पोलीस ठाणे निर्माण करण्यास मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीओएस-१३१७/प्र.क्र.३३/पोल-३**

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : १२ जून, २०१७

वाचा :-

१) पोलीस आयुक्त, औरंगाबाद शहर यांचे पत्र क्र.कक्ष-२/प्र.पुं.नगर.पो.स्टे./२०१५-१६/३५३, दिनांक १२.०४.२०१६.
२) जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०१६/गृहविभाग/नविनपोठानि/कावी-४४६, दिनांक १८.०६.२०१६
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-अ/४७/पो.आ.औबाद (पुंडलीकनगर पो.स्टे.)/१६/२०१६, दिनांक ०३.०८.२०१६ व दिनांक ०८.११.२०१६
४) पोलीस आयुक्त, औरंगाबाद शहर यांचे पत्र क्र.कक्ष-२/पो.स्टे प्रस्ताव/पुंडलीकनगर/२०१७/३३१, दिनांक १४.०४.२०१७

प्रस्तावना :-

औरंगाबाद शहराची लोकसंख्या अतिशय झपाट्याने वाढत असून शहराची लोकसंख्या जवळपास १६ लाखाच्या आसपास आहे. हे शहर ऐतिहासिकदृष्ट्या वेरुळ व अजिंठा लेणी या पर्यटन स्थळामुळे जगप्रसिध्द आहे. त्यामुळे या शहरात देश-विदेशातुन महत्त्वाचे व अतिमहत्त्वाचे व्यक्तींचे आगमन सतत चालु असते. औरंगाबाद शहराच्या औद्योगिक व शैक्षणिक क्षेत्रातील विकासामुळे या शहरात चिखलठाणा औद्योगिक वसाहत, वाळुज औद्योगिक वसाहत, शेंद्रा औद्योगिक वसाहत तसेच पैठण ते औरंगाबाद रोडवर औद्योगिक वसाहती निर्माण झालेल्या आहेत. औरंगाबाद शहरातील मुकुंदवाडी पोलीस ठाणे हे अत्यंत संवेदनशिल पोलीस ठाणे असून सदर पोलीस ठाण्याच्या अतंर्गत घडणाऱ्या गुन्ह्यांची संख्या जास्त आहे. त्यामुळे सदर परिसरात सतत निर्माण होणाऱ्या कायदा व सुव्यवस्थेच्या प्रसंगामुळे नविन पोलीस ठाणे निर्माण करण्याची अत्यंत गरज निर्माण झाली आहे. उक्त बाबींचा गांभिर्यपुर्वक विचार करुन सदर परिसरामध्ये कायदा व सुव्यवस्था राखणे व गुन्ह्यांवर प्रभावी नियंत्रण ठेवण्यासाठी पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य, मुंबई व

पोलीस आयुक्त, औरंगाबाद शहर यांनी उक्त संदर्भाधिन पत्रांन्वये पोलीस आयुक्त, औरंगाबाद शहर यांच्या आस्थापनेवरील मुकुंदवाडी पोलीस ठाणे व पोलीस मुख्यालय/नियंत्रण कक्षासाठी मंजूर असलेल्या मनुष्यबळातून मुकुंदवाडी पोलीस ठाण्याचे विभाजन करुन प्रस्तावित पुंडलीकनगर पोलीस ठाणे निर्माण करण्यास व सदर नवीन पोलीस ठाण्यासाठी लागणाऱ्या साधनसामग्रीवर होणारा खर्च हा पोलीस आयुक्त, औरंगाबाद शहर यांच्या घटक कार्यालयाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यास मान्यता देण्याबाबत शासनास विनंती केली आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

पोलीस आयुक्त, औरंगाबाद शहर यांच्या आस्थापनेवरील मुकुंदवाडी पोलीस ठाण्याचे विभाजन करुन पुंडलीकनगर पोलीस ठाणे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. पोलीस आयुक्त, औरंगाबाद शहर यांनी त्यांच्या आस्थापनेवरील मुकुंदवाडी पोलीस ठाणे व पोलीस मुख्यालय/नियंत्रण कक्षासाठी मंजूर असलेल्या पदांमधून उपरोक्त नमूद पुंडलीकनगर पोलीस ठाण्यासाठी खालील तक्त्यात नमूद पोलीस अधिकारी व कर्मचारी यांची पदे उपलब्ध करुन द्यावीत.

| अ.क्र. | पदाचे नाव | पदांची संख्या |
|---|---|---|
| १. | पोलीस निरीक्षक | ०१ |
| २. | सहायक पोलीस निरीक्षक | ०१ |
| ३. | पोलीस उप निरीक्षक | ०३ |
| ४. | सहायक पोलीस उप निरीक्षक | ०३ |
| ५. | पोलीस हवालदार | १२ |
| ६. | पोलीस नाईक | १० |
| ७. | पोलीस शिपाई | १५ |
| ८. | महिला पोलीस शिपाई | १० |
| **एकूण** | | **५५** |

३. उक्त नवनिर्मित पुंडलीकनगर नवीन पोलीस ठाण्यासाठी लागणाऱ्या साधनसामग्रीवर होणारा खर्च हा पोलीस आयुक्त, औरंगाबाद शहर यांच्या घटक कार्यालयाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१२१३०६५२२५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhiraj K Abhang

Digitally signed by Dhiraj K Abhang
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b83edfcbaa0fddb5983e8303bccd9a96ef7cc55853b8b449ff8dc53d69f1618d, cn=Dhiraj K Abhang
Date: 2017.06.12 13:04:04 +05'30'

**( धीरज कां. अभंग )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.राज्यमंत्री,गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री,गृह(ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), पोलीस महासंचालक यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. विशेष पोलीस महानिरीक्षक, औरंगाबाद परिक्षेत्र, औरंगाबाद.
९. पोलीस आयुक्त, औरंगाबाद शहर.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/२, मुंबई/नागपूर.
११. जिल्हाधिकारी, औरंगाबाद.
१२. पोलीस अधीक्षक, औरंगाबाद ग्रामीण.
१३. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.
१६. कार्यासन अधिकारी, व्यय-७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. कार्यासन अधिकारी, पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती, पोल-३.